# मलाही करता येईल

## एस्थेर मॉरिस महिलांना मतदानाचा हक्क मिळवून देते


लेखिका: लिंडा आर्म्स व्हाईट

चित्रे व सजावट: नॅन्सी कार्पेन्टर

अनुवाद: सुजाता गोडबोले




# मलाही करता येईल

## एस्थेर मॉरिस  महिलांना मतदानाचा हक्क मिळवून देते




लेखिका:  लिंडा आर्म्स व्हाईट

चित्रे व सजावट:  नॅन्सी कार्पेन्टर

अनुवाद:  सुजाता गोडबोले



१८२० साली सहा वर्षांची एस्थेर मॅक्विग आपली आई चहा कशी करते हे लक्षपूर्वक पाहत होती. “हे मलाही करता येईल,” ती म्हणाली.

“काय, तू चहा करणार?” आई म्हणाली, “मोठ्या मुली चहा करतात.”

“मला पण शिकायचं आहे,” एस्थेर म्हणाली आणि शिकली देखील. तिने पंपाने पाणी काढून भांडे भरले आणि चुलीवर उकळायला ठेवले. किटलीत  चहाची पत्ती टाकली आणि त्यावर उकळते पाणी ओतले. मग तो चहा तिने दोन कपात गाळला, एक तिच्या आईसाठी आणि एक तिच्यासाठी.



त्यांच्या न्यूयॉर्कच्या घराच्या खिडकीजवळ बसून चहा पिताना, तिला काही माणसे रस्त्यावरून झेंडे घेऊन जाताना दिसली. त्यांनी सणाला घालतात तसे चांगले कपडे घातले होते.

“आई, हे लोक कुठे चालले आहेत?” तिने विचारले.

“ते अमेरिकेचा नवा अध्यक्ष निवडण्यासाठी मतदान करायला निघाले आहेत,” आईने तिला सांगितले.

“बाबा पण मत देतील का?”

“हो, बाबा नेहमीच मत द्यायला जातात.”

“आई, तू पण मत देणार का?”

“नाही गं! फक्त पुरुषांनाच मत देता येते.”

आठ वर्षांची झाल्यावर, आई कसे सुरेख शिवणकाम करते हे एस्थेर पाहत होती. सुई-दोरा आत-बाहेर, आत-बाहेर असा सारखा फिरत होता आणि कापडावर एकसारखे टाके दिसत होते. एस्थेरचा हात आपोआप आईच्या हातासारखी हालचाल करत होता. “हे मला पण करता येईल,” ती म्हणाली. आणि तिने तसे करूनही दाखवले.





कापडाचे तुकडे घेऊन तिने आपल्या बाहुलीला कपडे शिवले. आणि जेव्हा तिच्या टाक्यात सफाई आणि नेटकेपणा आला, तेव्हा तिने बाबांना एक शर्ट शिवला.

एस्थेर ११ वर्षांची असताना तिची आई मरण पावली. तेव्हा तिने प्रथमच आपल्या बाबांना रडताना पहिले. त्यांनी आपल्या सर्व अकरा मुलांना जवळ बोलावले. “आता तुमच्या आईशिवाय आपण कसे राहणार हे मला तर समजतच नाही, पण तुम्ही सगळ्यांनी आता धीर धरून  एकमेकांची काळजी घ्यायला हवी,” ते म्हणाले.

अकरा भावंडातील  आठव्या क्रमांकाची एस्थेर देखील रडत होती. पण ती म्हणाली, “मी सर्व सांभाळेन बाबा,” आणि तिने ते खरे करून दाखवले.



एस्थेर जेव्हा १९ वर्षांची झाली, तेव्हा ती सहा फूट उंच होती. आता ती स्वतंत्र होती आणि श्रीमंत महिलांना फुग्याच्या बाह्यांचे कपडे शिवून देऊन ती आपला चरितार्थ चालवत असे.

या महिलांना जेव्हा त्यांच्या कपड्यांबरोबर मॅचिंग हॅट हव्या होत्या, तेव्हा ती नव्या नव्या पद्धतीच्या हॅट देखील बनवू लागली. लवकरच तिने हॅटचे दुकान उघडण्याचा विचार केला.

“एवढा मोठा व्यवसाय करायला तू अजून फार लहान आहेस,” सगळे तिला सांगू लागले.

यावर एस्थेरचे उत्तर होते, “मला नाही तसं वाटत.” आणि न्यूयॉर्कच्या ओवेगो मध्ये तिने हॅटचे दुकान उघडले.

गुलामगिरी नष्ट करण्याबाबतच्या आपल्या चर्चमधील सभांना एस्थेर आता जाऊ लागली. परंतु आपल्याला गुलाम बाळगण्याचा हक्क आहे असे अनेक लोकांना वाटत असे आणि ज्या बॅप्टिस्ट चर्चमध्ये या सभा होत असत त्याची मोडतोड करण्याची देखील त्यांची तयारी होती.

“तुम्हाला तसे करता येणार नाही, असा प्रयत्न जर कोणी केलाच तर मी त्यांना तसे करू देणार नाही.” एस्थेरने जाहीर केले.



वयाच्या २८ व्या वर्षी एस्थेरने आर्टमस स्लॅक यांच्याशी विवाह केला आणि काही वर्षांनी त्यांना एक मुलगा झाला, त्यांनी त्याचे नाव ठेवले आर्ची.

परंतु आर्टमस यांचे अपघाती निधन झाल्यावर एस्थेर यांनी एक मोठा निर्णय घेतला.

आपल्या मित्रमंडळींना त्यांनी सांगितले की, “आता मी इलिनॉय येथे जाणार आहे आणि आर्टमस यांच्या मालकीची जमीन ताब्यात घेऊन मी तेथेच आमच्या मुलाला मोठे करायचे ठरवले आहे.”

“पण तुला तसे करता येणार नाही,” तिच्या मित्रमंडळींनी तिला समजावण्याचा प्रयत्न केला. “इलिनॉय अजून मागासलेले आहे आणि तिथे अनेक धोकादायक लोक आणि जंगली प्राणीदेखील आहेत.”

“हो, पण मी तसेच करणार आहे,” ती म्हणाली आणि तिने तेच केले.



इलिनॉयमध्ये आर्टमसच्या जमिनीचा ताबा मिळवण्यासाठी तिला बराच काळ मोठा संघर्ष करावा लागला परंतु ती एक स्त्री असल्याने तिला वारसाहक्क नाकारण्यात आला. मग एस्थेरने आणखी एक हॅटचे दुकान उघडले.

पोलंडहून स्थलांतरित झालेले एक व्यापारी जॉन मॉरिस यांच्याशी एस्थेरने विवाह केला आणि १८५१ मध्ये तिने एडवर्ड व रॉबर्ट या जुळ्या मुलांना जन्म दिला.

परंतु जॉनना व्यवसायातून फारशी कमाई होत नव्हती. म्हणून एस्थेर मुलांना सांभाळणे, स्वयंपाक करणे, घरकाम यासोबतच पैसेही मिळवू लागली.





४६ वर्षांच्या असताना अमेरिकेच्या अध्यक्षपदासाठी निवडणूक होत असताना त्या  जॉनबरोबर गेल्या आणि मतदान कसे करतात हे त्यांनी खिडकीतून पाहिले.

जॉन बाहेर आल्यावर त्या म्हणाल्या, “हे तर मलाही करता येईल.”

“राजकारण हे पुरुषांचे काम आहे,” जॉन म्हणाले.

यावर एस्थेर यांचे उत्तर होते, “ हो, पण हा देश आमचा देखील आहे!”



उत्तरेकडील आणि दक्षिणेकडील राज्यांमध्ये जेव्हा यादवी युद्धाला सुरुवात झाली, तेव्हा गुलामगिरी नष्ट करण्यात यशस्वी झालेल्या  उत्तरेकडील राज्यांच्या सैन्यात आर्चीने प्रवेश घेतला होता याचा एस्थेरना अभिमान होता. थोड्याच दिवसात राज्यघटनेतील एका सुधारणेनुसार सर्व कृष्णवर्णीय पुरुषांना नागरिकत्वाचे हक्क देण्यात आले आणि त्यात मतदानाच्या हक्काचा देखील समावेश होता.

एस्थेर यांनी  सुसन बी. अँथनी यांचे महिलांच्या हक्कांबाबतचे भाषण ऐकले तेव्हा कधीतरी महिलांना देखील मतदान करता येईल अशी त्यांना आशा वाटू लागली.



१८६९ साली ५५ वर्षाच्या एस्थेर आपल्या १८ वर्षांच्या मुलांना घेऊन नव्यानेच स्थापन करण्यात आलेल्या ‘वायोमिंग टेरिटरी’ मध्ये राहण्यास गेल्या. जॉन आणि आर्ची आदल्या वर्षीच तेथे गेले होते.

एस्थेर आणि मुलांनी गवताळ प्रदेशातून अनेक मैल रेल्वेने प्रवास केला, नंतर खडकाळ पर्वतांमधून ते ‘साऊथ पास सिटी’ ला घोडागाडीतून पोचले. तेथे सोने सापडल्यामुळे हे गाव घाईघाईने वसवण्यात आले होते. तेथे राहणाऱ्या २००० लोकांपैकी बहुतेक सर्व दंगेखोर तरुण होते. दिवसा ते सोन्याच्या खाणीत काम करत आणि रात्री दारूच्या गुत्त्यात जाऊन दारू पीत.

आपले सर्व सामान घेऊन मॉरिस कुटुंब एका लाकडी घरात राहू लागले आणि साऊथ पास सिटी हे त्यांचे नवे घर झाले. जॉनने  एक दारूचे दुकान उघडले.



एस्थेरने आणखी एक हॅटचे दुकान उघडले.

आर्चीने एक छापखाना विकत घेतला आणि एक वर्तमानपत्र सुरु केले.



या गावात सहा पुरुषांमागे एकच स्त्री असल्याने आजारी व जखमी लोकांची काळजी घेण्यासाठी, कपडे शिवण्यासाठी, बाळंतपण सुखरूप पार पडण्यास मदत करण्यासाठी आणि गावातल्या तरुणींना आईच्या हक्काने सल्ला देण्यासाठी नेहमीच कोणाची तरी जरूर भासत असे. “हे मला करता येईल,” एस्थेर  म्हणाल्या आणि त्यांनी ते सर्व केले.

एक दिवस एस्थेर यांनी भिंतीवर लावलेला
एक जाहीरनामा वाचला. त्यात लिहिले होते:

**“२१ वर्षांवरील सर्व पुरुष नागरिकांना पहिल्या प्रादेशिक निवडणुकीसाठी मतदानास येण्याचे आवाहन.”**

एस्थेर यांनी आजूबाजूला अस्ताव्यस्त पडलेल्या तरुणांकडे पहिले.

“आता मी काहीतरी करण्याची वेळ आली आहे,” त्या म्हणाल्या.



एस्थेरच्या मुलांनी जेव्हा त्यांना घराकडे जाताना पहिले, तेव्हाच त्यांच्या लक्षात आले की आता बहुतेक मोठा बदल घडून येणार आहे, परिस्थिती आहे तशी फार काळ राहू शकणार नाही.

प्रादेशिक विधानसभेच्या निवडणुकीसाठी जे दोन उमेदवार उभे होते त्यांना एस्थेर यांनी नागरिकांशी बोलण्यासाठी आपल्या घरी येण्याचे आमंत्रण दिले. मग त्यांनी आपल्या भागातील सर्व प्रभावशाली लोकांना आमंत्रण पाठवले व म्हटले, “माझ्या घरी चहाला आणि उमेदवारांशी चर्चा करायला या.”

आपले लहानसे घर त्यांनी छपरापासून घासून पुसून स्वच्छ केले, पडदे धुतले आणि आपला पोशाख छान इस्त्री करून ठेवला.



उमेदवार आणि इतर श्रोते आल्यावर एस्थेरनी सर्वांना चहा दिला. त्या म्हणाल्या, "मला वायोमिंग मधील एक गोष्ट फार आवडते आणि ती म्हणजे इथे प्रत्येकजण महत्त्वाचा आहे. स्त्रिया आणि पुरुष असे आपण सर्वजण मिळून गावाचा कारभार चालवतो."

"हो, खरे आहे." पाहुण्यांनाही पटले.

"आणि शिवाय इथल्या लोकांना नव्या गोष्टी करून पाहायला उत्साह असतो."

पाहुण्यांना हे देखील पटले.

एस्थेर खुश झाल्या. मग त्या उमेदवारांकडे वळल्या. "आता मला सांगा, जर तुम्ही निवडून आलात तर सर्व महिलांना मत देता यावे असे विधेयक तुम्ही मांडाल का?"

गच्च भरलेल्या त्या खोलीत अचानक शांतता पसरली. सर्वजण स्तब्ध झाले.

अखेर, कर्नल विल्यम ब्राईट बोलायला उभे राहिले. ते म्हणाले, “श्रीमती मॉरिस, माझ्या पत्नीला सुद्धा मतदान करायला आवडेल. ती चांगली शिकलेली आहे आणि हुशार देखील आहे. खरे सांगायचे तर, माझ्यापेक्षा तिला या विषयातले अधिक समजते. मी जर निवडून आलो, तर मी असे विधेयक नक्की मांडेन.”

यात आपण मागे राहिलो असे दिसू नये म्हणून दुसरे उमेदवार हरमन निकरसन यांनी पण दुजोरा दिला.

ती छोटीशी खोली टाळ्यांच्या कडकडाटाने भरून गेली आणि एस्थेर आपल्या जागेवर बसल्या. “धन्यवाद,” त्या म्हणाल्या.



लोकांनी त्यांना सावध केले की हे विधेयक जरी मांडले, तरी विधानसभा सदस्यांची त्याला मान्यता मिळावी लागेल. त्यानंतर त्यावर गव्हर्नरने सही करावी लागेल. आतापर्यंत तरी असे कुठेच झालेले नाही. इथे तरी ते घडेल असे त्यांना का वाटते?

आतापर्यंत कधीच न झालेल्या गोष्टी देखील दररोज घडत असल्याचे एस्थेर पाहत होत्या. हे विधेयक पारित व्हावे यासाठी त्यांनी विधानसभेच्या सदस्यांना पत्रे लिहिली, त्यांच्या भेटी घेतल्या.

आणि तसेच झाले. १० डिसेंबर १८६९ रोजी गव्हर्नर जॉन कॅम्बेल यांनी या विधेयकावर सही केली आणि तो कायदा झाला!

## वायोमिंग मधील महिलांना




## मतदानाचा हक्क मिळाला!

देशभरातील सर्व महिलांनी वायोमिंग मधील महिलांबरोबर आनंदोत्सव साजरा केला.



या... हू... !



वाहवा!...



हुर्रे ...!

पण काही लोकांना हे आवडले नाही. आठच दिवसांनी, 'जस्टीस ऑफ पीस', जेम्स स्टीलमन या न्यायाधीशांनी राजीनामा दिला. ज्या ठिकाणी महिलांचा कायदे बनवण्यात सहभाग असेल, अशा ठिकाणी न्यायदान करण्यास त्यांनी साफ नकार दिला.

आता नवीन न्यायाधीशांची नेमणूक करावी लागणार होती.

एस्थेरच्या मुलांनी आग्रह केला, "आई, तुला हे काम चांगले जमेल."

म्हणून मग त्यांनी या पदासाठी अर्ज केला.

त्यावेळी आर्ची हा एस्थेर यांचा मुलगा न्यायालयात अधिकारी होता, त्याने मोठ्या अभिमानाने आपल्या आईला या पदाची शपथ दिली. आणि मग एस्थेर  मॉरिस या  हे सार्वजनिक पद सांभाळणाऱ्या  देशातील पहिल्या महिला ठरल्या.

परंतु, स्टीलमन या न्यायाधीशांनी सरकारी कामाच्या कागदपत्रांची फाईल  एस्थेर यांच्याकडे देण्यास नकार दिला.

एस्थेर  म्हणाल्या, "काही हरकत नाही. आर्ची तू बाजारात जाऊन माझ्यासाठी एक फाईल घेऊन येशील का? मी माझी नवी फाईलच सुरु करेन."

आणि अर्थात त्यांनी  तसेच केले.

६ सप्टेंबर १८७० रोजी, त्यांच्या घरी झालेल्या चहापानाच्या कार्यक्रमानंतर एक वर्षाने न्यायाधीश एस्थेर मॉरिस आपला छान पोशाख घालून आपले पती जॉन आणि मुलांबरोबर गावातील कच्च्या रस्त्यावरून मतदान करायला गेल्या. वायोमिंग मध्ये त्यांच्यासारख्या आणखी एक हजार महिलांनी त्या दिवशी मतदान केले. महिलांना मतदानाचा हक्क कायमचा बहाल करणारा वायोमिंग हा अमेरिकेतील पहिला प्रदेश ठरला.

महिलांनी मतदान करावे असे जॉनना अद्यापही मान्य नव्हते, म्हणून मतदानाला जात असताना देखील कोणत्या उमेदवाराला मत द्यावे, कोणते विषय महत्त्वाचे आहेत याबद्दल ते शिकवण्याचा प्रयत्न करत होते.

पण एस्थेर आपला हात उंचावून म्हणाल्या,

“मला ते चांगले समजते.”

आणि त्यांनी  मतदान केले.



## लेखिकेचे टिप्पण

चर्च, दफनभूमी आणि सरकारी नोंदी यामधून एस्थेर मॉरिस यांच्यासंबंधी, त्यांच्या हॅटच्या व्यवसायाविषयी आणि दोन विवाहासंबंधी फारच थोडी माहिती मिळाली.

एस्थेर  यांचे ओवेगो  मधील चर्च हे गुलामगिरीच्या विरोधात स्थापन करण्यात आलेले देशातील पहिलेच चर्च होते.

समान हक्कांविषयीच्या त्यांच्या लढ्यात महिलांसाठी मतदानाचा हक्क मिळवण्याचा प्रयत्न होता हे त्यांनी आपल्या बहिणीला लिहिलेल्या पत्रावरून समजून येते. १८९५ साली निवडून आलेली प्रतिनिधी म्हणून त्यांनी ‘राष्ट्रीय मतदान परिषदेत’ सहभाग घेतला होता असेही सांगितले जाते.

एक उमेदवार कॅप्टन एच.जी. निकरसन यांनी काही काळानंतर सांगितले होते त्यानुसार त्यांच्या चहापानाची सभा खरोखरच पार पडली होती असे अनेक इतिहासकारांचे मत आहे, पण काहींना त्याबद्दल शंका वाटते. परंतु वायोमिंग प्रदेशात महिलांना मतदानाचा हक्क मिळवून देण्यासाठी एस्थेर यांचे प्रयत्न कारणीभूत होते याबाबत मात्र सर्वांचे एकमत आहे. त्यांच्या मुलाने त्यांना साऊथ पास सिटी येथे न्यायाधीशपदाची शपथ दिली आणि त्या देशातील पहिल्या महिला न्यायाधीश आणि राजकीय सार्वजनिक पद सांभाळणाऱ्या पहिल्या महिला होत्या  याबाबतही दुमत नाही.

अनेक बाबतीत जरी त्या अशा प्रकारे ‘पहिल्या’ ठरल्या असल्या, तरीही त्यांना अमेरिकेच्या अध्यक्षांच्या निवडणुकीत मतदान करता आले नव्हते. एस्थेर यांच्या वायोमिंग मधील चहापानाच्या कार्यक्रमानंतर ५१ वर्षांनी आणि  एस्थेर  यांच्या मृत्यूनंतर १८ वर्षांनी १९२० मध्ये अमेरिकेच्या राज्यघटनेतील १९व्या  दुरुस्तीनंतर त्या देशातील महिलांना सार्वत्रिक निवडणुकीत मतदान करण्याचा हक्क मिळाला.

वायोमिंग राज्याच्या मुख्यालयासमोर आणि अमेरिकेच्या कॅपिटॉल मधील पुतळे ठेवण्याच्या इमारतीत एस्थेर यांचा पुतळा उभारण्यात आला आहे.

आज जगातील बहुतेक देशांमध्ये महिला मतदान करतात, उच्च पद भूषवतात, आणि सरकारी कामकाजात महत्त्वाचा सहभाग घेतात. परंतु, अजूनही काही देशांमध्ये महिलांच्या म्हणण्याला किंमत दिली जात नाही. आज जर एस्थेर असत्या, तर त्यांनी आपली चहाची किटली बाहेर काढून कामाला सुरुवात केली असती.